नागपूर सुधार प्रन्यासच्या खसरा क्र.८३,८४/१ मौजा चिखली (देवस्थान) अभिन्यासातील सार्वजनिक/ निमसार्वजनिक उपयोगाची १८०७९.०० चौ.मी. जागा वाटपाबाबत.

प्रादेशिक उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर या कार्यालयाकरीता सवलतीच्या दराने वाटप करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नासुप्र-२०१५/प्र.क्र.४९/नवि-२६

हुतात्मा राजगूरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक- ३१ मार्च, २०१५

**प्रस्तावना :-**

नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाच्या ११०७ व्या सर्वसाधारण सभेतील ठराव क्रमांक ५/११०७/१३.३.२०१२/का.अ./जा.वा.दिनांक १३.०३.२०१२ नुसार विश्वस्त मंडळाने नागपूर सुधार प्रन्यासच्या खसरा क्रमांक ८३, ९४/१ (पार्ट) मौजा चिखली (देवस्थान) या अभिन्यासातील अंदाजे क्षेत्रफळ १८०७९.०० चौ.मी. उपलब्ध असलेली जागा शासनाच्या प्रादेशिक परिवहन कार्यालयास नागपूर शहर, पूर्व उप प्रादेशिक परिवहन कार्यालयासाठी वाटप करण्याबाबतच्या प्रस्तावाचा विचार करुन पुढीलप्रमाणे ठराव केला:-

१. नागपूर शहराच्या मंजूर विकास योजनेत सदर जागा Housing for Dishoused करिता आरक्षित असल्याने, सदर जागेचा महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ अन्वये सार्वजनिक / निमसार्वजनिक असा उपयोग फेरबदल करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर जागेचा दर नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ मधील नियम क्र.७ (३) अंतर्गत दर निर्धारण समितीद्वारा निश्चित करण्यात यावा व त्यानुसार प्रादेशिक परिवहन कार्यालयाद्वारे संपूर्ण रक्कमेचा भरणा प्रन्यासमध्ये केल्यानंतर सदर जागेचे वाटप एकूण प्रव्याजीवर २ टक्के दराने वार्षिक भूभाटक आकारुन करण्यात यावे.

**२.** उपरोक्त अनुषंगाने शासन अधिसुचना क्रमांक टीपीएस-२४१३/५६१/प्र.क्र.११/२०१४/न.वि.०९, दिनांक २७.११.२०१४ अन्वये मौजा चिखली (देवस्थान) येथील खसरा क्रमांक ८३, ८४/१ मधील १.८०६ हेक्टर जागा “आरक्षण क्र.एमई¬५ बेघरांसाठी घरे” मधून वगळण्यात येऊन मुक्त झालेली जागा सार्वजनिक/ निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्यात आली आहे.

३. उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (पूर्व) या शासकीय कार्यालयासाठी नागपूर सुधार प्रन्यासची १८०७९.०० चौ.मी. जागा वाटप करण्यासंदर्भात मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४.०३.२०१५ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने सदरची जागा उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर या कार्यालयासाठी सवलतीच्या दराने मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

## शासन निर्णय :-

मा.मुख्यमंत्री महोदयांकडे दिनांक २४.०३.२०१५ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार त्याचप्रमाणे उप प्रादेशिक परिवहन कार्यालय हे शासनाच्या गृह (परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय आहे हे विचारात घेता नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग १९८३ मधील नियम २६ नुसार शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर या कार्यालयासाठी नागपूर सुधार प्रन्यासची मौ.चिखली (देवस्थान) येथील खसरा क्रमांक ८३, ८४/१ मधील १८०७९ चौ.मी. जागा वाटप करताना नागपूर सुधार प्रन्यासने पुढीलप्रमाणे प्रव्याजाची व भूभाटक आकारणीबाबत कार्यवाही करावी :-

१. सन २०१४ च्या सिध्द शीघ्र गणकानुसार होणा-या प्रव्याजी रक्कमेच्या २५ टक्के दराने रक्कम आकारावी.
२. सदर जागेसाठी वार्षिक भूभाटक रक्कम वरीलप्रमाणे २५ टक्के दराप्रमाणे येणा-या प्रव्याजी रक्कमेनुसार आकारावी.

सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी उपरोक्त शासन निर्णयानुसार कार्यवाही करुन अंमलबजावणीचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११५०९३०८८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: CN = Jayasingrao Nanasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.03.31 15:30:25 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. . मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. अप्पर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग,यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
६. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
७. जिल्हाधिकारी, नागपूर विभाग, नागपूर
८. प्रादेशिक परिवहन अधिकारी, नागपूर शहर प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर.
९. निवड नस्ती, (न.वि.२६) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.